कोषागारात पितळी बिल्याऐवजी देण्यात येणारे बारकोडयुक्त कागदी टोकन हरविल्यास दंडात्मक रक्कम आकारण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
शासन निर्णय क्र. संकीर्ण - १०११ / प्र. क्र. १०/ कोषा प्र - ५
दिनांक: २९ जुलै, २०११.

**संदर्भ:-** वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण १०११ / प्र. क्र. १० / कोषा प्र -५, दि. १७ फेब्रुवारी, २०११

**शासन निर्णय:-** उपरोक्त संदर्भाधिन शासन निर्णयान्वये कोषागारात आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी देयके सादर केल्यानंतर पितळी बिल्ल्यांऐवजी कागदावरच संगणकीय आज्ञावलीतून छापलेली बारकोडयुक्त कागदी बिल्ले देण्याची तरतूद करण्यात आली आहे. कोषागारात देयक स्विकृतीनंतर जेव्हा धनादेश अथवा आक्षेपित देयके घेण्यासाठी आहरण व संवितरण अधिकाऱ्यांचा संदेशवाहक येतील तेव्हा त्या कागदी बिल्ल्यांचे बारकोडद्वारे खात्री करुन संबंधीत धनादेश अथवा आक्षेपित देयक अदा करण्यात येते. त्यामुळे कागदी बिल्ले हे पूर्वीच्या पितळी बिल्ल्यांइतकेच महत्वाचे असल्याने सदर बिल्ले संबंधीत आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी काळजीपूर्वक जपून ठेवणे आवश्यक आहे.

बिल्ले काळजीपूर्वक जपून ठेवण्याच्या दृष्टीने यापूर्वी पितळी बिल्ला हरविल्यास त्यासाठी रु.५००/- इतका दंड आकारला जात असे. तथापी, सुधारीत पध्दतीनुसार दिले जाणारे कागदी बिल्ले हरविल्यास कोणत्याही दंडाची तरतूद उपरोक्त संदर्भाधिन शासन निर्णयात करण्यात आली नव्हती.

वरील बाबीचा विचार करुन आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी कागदी बिल्ले काळजीपूर्वक जपून ठेवावे, याकरीता शासन असे आदेश देत आहे की, कागदी बिल्ले हरविल्यास त्याबाबत प्रत्येक कागदी बिल्ल्यास रु. ५०/- इतका दंड आकारण्यात यावा. याप्रमाणे वसूल केलेला दंड रकमेच्या वसुलीबाबत पितळी बिल्ले हरविल्याप्रकरणी प्रचलीत असलेली पध्दती अवलंबिण्यात यावी.

सदर शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०७२९१५१५१८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(स. अ. मु. नकवी)
उप सचिव तथा विशेष कार्य अधिकारी,
वित्त विभाग

प्रति,
राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे व उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,

सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
प्रशासकीय विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व कार्यालय प्रमुख,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र,मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल (लेखा परीक्षा )-१, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा परीक्षा )-२, महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल (वाणिज्यिक लेखापरीक्षा ), महाराष्ट्र, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, सचिवालय, मुंबई,
प्रबंधक, उच्च न्यायालय ( मुळ शाखा ),मुंबई,
प्रबंधक, उच्च न्यायालय ( अपील शाखा ), मुंबई,
प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
सह संचालक, लेखा व कोषागारे, पुणे, नाशिक, नागपूर, अमरावती, औरंगाबाद, कोकण भवन, नवी मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/वांद्रे,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व कोषागार अधिकारी,
सर्व उपकोषागार अधिकारी,
निवड नस्ती, वित्त विभाग-कोषा प्र-५.

------